जिल्हा परिषदांमधील कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग या पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा-११२०/प्र.क्र.१४८/पापु-२३**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: २८ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१०(७), दिनांक ०४/०९/२०२०.

२) **मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्रमांकः** मजीप्रा/२०२०(११)/जल जीवन मिशन-का.अ./आस्था-१, दिनांक १८/०९/२०२०.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण भागातील कुटुंबांना सन २०२४ पर्यंत "हर घर नल से जल" हे पाणी पुरवठ्याचे उद्दिष्ट साध्य करण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याचा निर्णय घेतला आहे. या शासन निर्णयानुसार जिल्ह्यातील जल जीवन मिशनच्या अंमलबजावणीची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनवर सोपविण्यात आली आहे. महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम ७९ (अ) नुसार प्रत्येक जिल्हा परिषदेमध्ये जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन स्थापन करण्यात आले असून त्यांच्यामार्फत जिल्ह्यांमधून जल जीवन मिशन राबविण्यात येत आहे. त्यामुळे जिल्ह्यातील जल जीवन मिशनच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी जिल्हा परिषदेमधील कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग यांची भूमिका अत्यंत महत्वाची आहे.

राज्यातील जिल्हा परिषदांमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील कार्यकारी अभियंत्यांची पदे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडील कार्यकारी अभियंत्यांमधून प्रतिनियुक्तीने भरली जातात. प्रतिनियुक्तीचे आदेश हे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून निर्गमित केले जातात. सध्या राज्यातील अनेक जिल्हा परिषदांमध्ये ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील कार्यकारी अभियंता ही पदे रिक्त

असल्याचे दिसून आले असून या पदांचा अतिरिक्त कार्यभार जिल्हा परिषदेतील अन्य कार्यकारी अभियंता अथवा उपअभियंता यांच्याकडे सोपविण्यात आला आहे.

राज्यामध्ये नव्याने सुरु झालेल्या जल जीवन मिशनची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरिता व मिशन अधिकाधिक परिणामकारक होण्याकरिता सध्याच्या अस्तित्वातील अंमलबजावणी यंत्रणेच्या कार्यपद्धतीमध्ये सुधारणा होणे आवश्यक आहे. त्यामुळे जिल्हा पातळीवर जल जीवन मिशनची अंमलबजावणी योग्य रीतीने होण्याकरिता ज्या जिल्हा परिषदांमध्ये ग्रामीण पाणी पुरवठा विभागात पूर्ण वेळ कार्यकारी अभियंता उपलब्ध नाहीत, अशा ठिकाणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडील निवडक कार्यकारी अभियंता यांच्याकडे अतिरिक्त कार्यभार सोपविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

## शासन आदेश :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारता घेऊन, राज्यातील खालील जिल्हा परिषदांमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील कार्यकारी अभियंता ही पदे रिक्त असल्याने या पदांचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कार्यकारी अभियंता यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता यांचे नाव व पदनाम |
|---|---|---|
| **पुणे विभाग** | | |
| १ | सांगली | श्री.व्ही.एल. कुलकर्णी,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सांगली. |
| २ | कोल्हापूर | श्री.डी.के. महाजन,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, कोल्हापूर. |
| ३ | सोलापूर | श्री.पी.सी. भांडेकर,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, सोलापूर. |
| **नाशिक विभाग** | | |
| ४ | नाशिक | श्रीम.एस.बी. नरवाडे,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग,<br>जल व्यवस्थापन विभाग, नाशिक. |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता यांचे नाव व पदनाम |
|---|---|---|
| ५ | जळगाव | श्री.एस.सी. निकम,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, जळगाव. |
| ६ | अहमदनगर | श्री.एम.जी. सराफ,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, अहमदनगर. |
| **औरंगाबाद विभाग** | | |
| ७ | औरंगाबाद | श्री.अजय जे. सिंह,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, औरंगाबाद. |
| ८ | नांदेड | श्री.व्ही.एल. कुलकर्णी,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, नांदेड. |
| ९ | लातूर | श्री.एस.व्ही. कायंदे,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, लातूर. |
| **अमरावती विभाग** | | |
| १० | अमरावती | श्री.वि.भा. सोळंके,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, अमरावती. |
| **नागपूर विभाग** | | |
| ११ | नागपूर | श्रीम.के.एस. भोळे,<br>कार्यकारी अभियंता, सहाय्यक मुख्य अभियंता, मुख्य अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे कार्यालय, नागपूर. |
| १२ | गोंदिया | श्री.आर.पी. चंद्रिकापुरे,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, गोंदिया. |
| १३ | चंद्रपूर | श्री.के.आर. घोडमारे,<br>कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, चंद्रपूर. |

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) यांना कळविण्यात येत आहे की, अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा. यांना जिल्हा परिषदांच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागातील कार्यकारी अभियंता पदाचा कार्यभार तात्काळ सोपविण्यात यावा व तसा अहवाल शासनास सादर करावा.

अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या कार्यकारी अभियंता यांना अतिरिक्त कार्यभाराचे विशेष वेतन शासन नियमानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या मार्फत अदा करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202010281636359128 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.10.28 16:58:53 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

कार्यकारी अभियंता (संबंधित), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

**प्रत :-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई.
६. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, शिवाजीनगर, पुणे.
७. मुख्य प्रशासकीय अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
८. सह सचिव/ उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व).
९. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१०. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व).

१३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.

१४. निवडनस्ती (कार्यासन पापु-२३).